**अंगणवाडी सेविका / मदतनीस / मिनी अंगणवाडी सेविका यांचे मानधन अदा करण्यासाठी अर्थसंकल्पित केलेला निधी वितरीत करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**महिला व बाल विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः एबावि-२०१६/प्र.क्र.२८३/का.६**

नवीन प्रशासन भवन, ३ रा मजला,
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : ७ मार्च, २०१७

**शासन निर्णय-**

महिला व बाल विकास विभागामार्फत एकात्मिक बाल विकास सेवा योजना ही केंद्र पुरस्कृत योजना आयुक्त,एकात्मिक बाल विकास सेवायोजन,नवी मुंबई या कार्यालयाकडून राबविण्यात येत आहे. सन २०१६-१७ या चालू आर्थिक वर्षी अद्यापपर्यंत अंगणवाडी सेविका / मिनी अंगणवाडी सेविका / मदतनीस यांच्या केंद्र व राज्य हिश्श्याच्या मानधनासाठी (एल.आय.सी. योजनेच्या हप्त्याची रक्कम रु.३६.०० कोटी व भाऊबीज भेटीची रक्कम रु.२०.०० कोटी धरुन) एकूण रु.८९१.९३५८ कोटी इतका निधी आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना, महाराष्ट्र राज्य, नवी मुंबई कार्यालयास वितरीत करण्यात आलेला आहे. अंगणवाडी कर्मचाऱ्यांच्या मानधनासाठी निधी कमी पडणार असल्यामुळे अतिरिक्त रु.९०.५१६७ कोटी इतका निधी माहे डिसेंबर, २०१६ मध्ये पूरवणी मागणीद्वारे अर्थसंकल्पित करण्यात आलेला आहे.

शासन स्तरावरुन सद्य:स्थितीत एल.आय.सी. योजनेचा आढावा घेण्यात येत असल्यामुळे अंगणवाडी कर्मचाऱ्यांच्या मानधनापोटी पुरवणी मागणीद्वारे अर्थसंकल्पित करण्यात आलेल्या रु.९०.५१६७ कोटी इतक्या निधीमधून एल.आय.सी. योजनेच्या हप्त्यापेटीची यापूर्वीच आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना, महाराष्ट्र राज्य, नवी मुंबई कार्यालयास वितरीत करण्यात आलेली रु.३६.०० कोटी इतकी रक्कम वगळून उर्वरित रु.५४.५१६७ कोटी इतकी रक्कम अंगणवाडी कर्मचाऱ्यांच्या मानधनासाठी वितरीत करण्यास शासनाची मान्यता देण्यात येत आहे.

राज्य हिश्श्याच्या मानधनाचा लेखाशिर्षनिहाय तपशील पुढीलप्रमाणे दर्शविण्यात येत आहे.

(रुपये लाखात)

| लेखाशिर्ष | डिसेंबर-२०१६ मंजूर पुरवणी मागणी | वित्त विभागाने BDS वर उपलब्ध केलेला निधी | या शासन निर्णयान्वये वितरीत करण्यात येत असलेला निधी | अवितरीत ठेवण्यात येत असलेला शिल्लक निधी |
|---|---|---|---|---|
| २२३६०५४६ | १६८४.१९ | १६८४.१९ | ४५१.६७ | १२३२.५२ |
| २२३६००६३ | ७३६७.४८ | ७३६७.४८ | ५०००.०० | २३६७.४८ |
| एकुण | ९०५१.६७ | ९०५१.६७ | ५४५१.६७ | ३६००.०० |

हा शासन निर्णय नियोजन व वित्त विभागाच्या सहमतीने व वित्त विभाग अनौपचारीक संदर्भ क्रमांक १२३/२०१७/अर्थसंकल्प-७, दिनांक २४/२/२०१७ अन्वये मिळालेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०३०७१७००२४६८३० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Lalsing Ramchandra Gujar

Digitally signed by Lalsing Ramchandra Gujar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Women And Child Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=c3eb5f6c3e4855c5793924cf2a352b44266d360de02a2494e1a64477bf79d694, cn=Lalsing Ramchandra Gujar
Date: 2017.03.07 17:33:51 +05'30'

**(ला. रा. गुजर)**

उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१) महालेखापाल, महाराष्ट्र-१/२ (लेखा व अनुज्ञेयता)/(लेखा परिक्षा), मुंबई/नागपूर.
२) महालेखाकार (स्थानीय निकाय लेखापरिक्षा व लेखा), प्रतिष्ठा भवन, १०१, महर्षी कर्वे रोड, मुंबई
३) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
४) सर्व,जिल्हा कोषागार अधिकारी
५) आयुक्त, महिला व बाल विकास आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य पुणे.
६) आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना, रायगड भवन, नवी मुंबई.
७) वित्त विभाग (व्यय/६ ,अर्थसंकल्प-७), मंत्रालय, मुंबई.
८) सह सचिव (नियोजन विभाग),मंत्रालय,मुंबई.
९) उप सचिव (श्री. गुजर /श्रीम. निवतकर), महिला व बाल विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०) कक्ष अधिकारी (का-४), महिला व बाल विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
११) निवड नस्ती -का-६.